जनगणना कार्यक्रम - २०११
खर्चासाठी अंदाजपत्रकात मुख्य लेखाशीर्ष
पुनरुज्जिवित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक : जनगणना २०१०/१२२४/प्र.क्र.८८/५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १५.०५.२०१०

वाचा :- १) भारत सरकार, गृह मंत्रालय, जनगणना कार्यालय, महाराष्ट्र यांचे पत्र क्रमांक एमएएच/सीईएन/२०११/ क्लेरिकल असिस्टंट ९९, दिनांक १८ मार्च, २०१०.
२) भारत सरकार, गृह मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक जी २३०११/०१/०९-बीसी, दि. २९.३.२०१०.

**शासन निर्णय :-**

संपूर्ण भारतात इ.स.२०११ च्या जनगणनेची कार्यवाही सुरु झाली आहे. सदरहू जनगणना दोन टप्प्यांत १) घरयादी तयार करणे, २) प्रत्यक्ष लोकसंख्येची गणना करणे याप्रमाणे होणार आहे. त्यानुसार २०११ च्या जनगणनेच्या कामासाठी राज्यातील जिल्हा व तहसील स्तरावर तसेच लोकसंख्या जास्त असलेल्या शहरांमध्ये महानगरपालिका क्षेत्रातील कर्मचा-यांच्या नेमणुका करण्यास भारत सरकारने मंजूरी दिलेली आहे. जनगणना २०११ च्या पहिल्या टप्प्यातील कामात घरयादी तयार करण्याकरीता प्रगणक व पर्यवेक्षक यांच्या नेमणुका करण्यात येणार आहेत. या खर्चाची १००% प्रतिपूर्ती केंद्र शासनाकडून होणार असून त्यासाठी कर्मचा-यांचे वेतन, प्रगणक व पर्यवेक्षक यांचे वेतन, प्रशिक्षण भत्ता इत्यादी अनुषंगिक बाबी याकरीता भारत सरकारने रु. ३,०१,०८,३००/- (रुपये तीन कोटी आठ हजार तीनशे फक्त) एवढी रक्कम वेतन व इतर भत्त्यासाठी अग्रिम म्हणून मंजूर केली आहे. तसेच रु.२५,२८,५००/- (रुपये पंचवीस लाख अठ्ठावीस हजार पाचशे फक्त) एवढी रक्कम कर्मचा-यांच्या प्रशिक्षणासाठी मंजूर केली असून सदर रकमा (**एकूण** = रु.३,२६,३६,८००/- (रुपये तीन कोटी सव्वीस लाख छत्तीस हजार आठशे फक्त) भारत सरकार यांचेकडून महालेखापाल कार्यालय, मुंबई यांचेमार्फत राज्य शासनाच्या एकत्रित निधीत जमा झाली आहे. त्यामुळे पहिल्या टप्प्यातील कामाच्या खर्चासाठी (**एकूण** = रु.३,२६,३६,८००/- (रुपये तीन कोटी सव्वीस लाख छत्तीस हजार आठशे फक्त) उपलब्ध करणे आवश्यक आहे.

जनगणना २०११ साठी खाली दर्शविल्याप्रमाणे मुख्य लेखाशीर्ष पुनरुज्जिवित करुन सामान्य प्रशासन विभागाच्या अंदाजपत्रकात पुढील अटींच्या अधीन राहून उघडण्यात येत आहे.

मागणी क्र.ए ०७-ए
" ३४५४ - जनगणना सर्वेक्षण व सांख्यिकी,
०१ - जनगणना,
००१ - संचालन व प्रशासन
०० -
०१ - जनगणना २०११, (३४५४ ०३४ ९)
०१ - वेतन
१३ - कार्यालयीन खर्च.
११ - देशांतर्गत प्रवास खर्च किंवा शासन निर्णय दि. १६.०१.२००८ नुसार अन्य कोणतेही उद्दीष्ट"
५० - इतर खर्च

**अटी -**

१. उपरोक्त मुख्य लेखाशीर्षाखाली करण्यात येणा-या खर्चाची नोंद दरमहा करण्यात यावी. या दरमहा खर्चाची प्रतिपूर्ती दरमहा भारत सरकारकडून देय आहे.

२. वेतन, प्रवासभत्ता व आकस्मिक कारणासाठी केलेल्या खर्चाची देयके उद्दीष्टनिहाय स्वतंत्र तयार करुन व उपरोक्त उद्दीष्टांपैकी संबंधीत उद्दीष्ट नमूद करुन स्वतंत्रपणे कोषागारात सादर करावीत.

३. अतिरिक्त कर्मचा-यांच्या नियुक्तीवरील खर्चाची प्रतिपूर्ती भारत सरकारकडून देय आहे. मात्र, त्यासाठी संबंधीत जिल्हाधिका-यांनी त्या त्या महिन्यात केलेल्या खर्चाचा तपशील **सोबत जोडलेल्या प्रपत्रामध्ये** सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन ५), मंत्रालय, मुंबई ३२ यांचेकडे दर महिन्याला सादर करावा. तसेच भारत सरकारच्या मार्गदर्शक तत्त्वांनुसार त्याच वित्तीय वर्षामध्ये पूण करण्यासाठी संपूर्ण महाराष्ट्रातील खर्चाची प्रतिपूर्ती संकलित करुन दरमहा सामान्य प्रशासन विभागाने महालेखापाल कार्यालयाकडे पाठवावी.

४. या लेखाशीर्षाखाली होणारा खर्च अन्य कोणत्याही उप/गौणलेखाशीर्षाखाली दर्शवू नये.

३. हा शासन निर्णय प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक टीएम/सीएच - १/जीएडी/युओआर/८६, दिनांक २१.०४.२०१० व वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २९५/१०/व्यय ४, दिनांक ११.५.२०१० अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(अ. द. जोशी)
**शासनाचे अवर सचिव**

प्रति,

सर्व महानगरपालिका आयुक्त,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व मंत्रालयीन विभाग
सर्व जिल्हाधिकारी,
संचालक, लेखा व कोषागारे,मुंबई,
सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला,मुंबई ३२,(२ प्रती)
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन,मुंबई (२० प्रती)
वित्त विभाग ( व्यय ४/अर्थसंकल्प ३/अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई,
संचालक, जनगणना संचालनालय, एक्स्चेंज बिल्डींग, २ रा मजला, सर शिवसागर रामगुलाम मार्ग, बेलॉर्ड इस्टेट, मुंबई १,
प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा)१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई १,
प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा)१/२, महाराष्ट्र राज्य, नागपूर,
सामान्य प्रशासन विभाग/का.२५ (२ प्रती),
सामान्य प्रशासन विभाग/का.१९ व २६,
निवडनस्ती.

- 96 -

## Format

Treasury : ……………………………………………

Grant 'A' CRC Code : 3454 ……………………

| Sr. No. | Vr. No. | Nature of bill | Gross Amount | Net Amount |
|---|---|---|---|---|
| 1 | 2 | 3 | 4 | 5 |
| | | | | |

Dy. Collector of Census

Dist. : ………………………